**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातील परंपरागत कृषि विकास योजना ९३२ गट व ३५० गटांकरिता सन २०२१-२२ मध्ये अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता राबविण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३२१/ प्र.क्र. १३२/१-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०००३२
दिनांक: २९ मार्च, २०२२

**संदर्भ:** १) केंद्र शासनाने DAC Website: agricoop.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या परंपरागत कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सुचना.
२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/पीकेव्हीवाय/निमा/अजमाती/३५३५/२०२२, दिनांक ३१.०१.२०२२
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg(५९००६६/टीएफएस), दि. २०.०७.२०२१
५) कृषिव पदुम विभाग शासन निर्णय क्र. योजना ३३२०/प्र.क्र.७४/१-अे, दि. ०२.१२.२०२०
६) कृषिव पदुम विभाग शुध्दीपत्रक क्र. योजना ३३२०/प्र.क्र.७४/१-अे, दि. ०४.०२.२०२१
७) कृषिव पदुम विभाग शासन निर्णय क्र. योजना ३३२१/प्र.क्र.१३२/१-अे, दि. २९.१२.२०२१
८) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी २०२१/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दिनांक २४.०३.२०२२

**प्रस्तावना -:**

परंपरागत कृषी विकास योजनेअंतर्गत सन २०१६-१७ मध्ये ९३२ गट व सन २०२०-२१ मध्ये ३५० गट स्थापन करून योजना राबविण्यात येत आहे. योजनेअंतर्गत एकदा निवड केलेल्या गट/लाभार्थीस तीन वर्षे लाभ देण्यात येतो.

सन २०२०-२१ मध्ये केंद्र शासनाकडून वितरीत झालेला परंतू कोविड २०१९ च्या पार्श्वभूमीवर केंद्र हिस्स्याचा ९३२ गटांचा अखर्चित निधी रु. ३६.१६ लाख तसेच ३५० गटांचा अखर्चित निधी रु. २८८.८४ लाख संदर्भ क्र. ४ वरील केंद्र शासनाच्या पत्रान्वये पुर्नजिवित (Revalidate) करुन दिलेला आहे. सदर निधी मध्ये अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिस्स्याचा आता वितरीत करावयाचा ९३२ गटांसाठीचा निधी रु. ३.८४ लाख व ३५० गटांसाठीचा निधी रु. १८.२० लाख असा एकूण रु. २२.०४ लाख एवढया केंद्र हिस्स्याच्या निधीचा समावेश आहे.

सन २०२१-२२ मध्ये अनुसूचित जमाती प्रवर्गाच्या ९३२ गटांच्या निधीपैकी केंद्र हिस्सा रु. ३.८४ लाख व त्यास पुरक राज्य हिस्सा रु. २.८९ लाख असा एकुण रु. ६.७३ लाख निधी तसेच ३५० गटांच्या निधीपैकी केंद्र हिस्सा रु. १८.२० लाख व त्यास पुरक राज्य हिस्सा रु. १२.१३ लाख असा एकूण रु. ३०.३३ लाख निधीचा समावेश आहे. अशाप्रकारे एकूण केंद्र हिस्सा रु. २२.०४ लाख व त्यास पुरक राज्य हिस्सा रु. १५.०२ लाख असा एकूण रु. ३७.०६ लाख निधी वितरीत करावयाचा आहे.

सदर योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्याकरिता संदर्भ क्र. ५ व संदर्भ क्र. ६ वरील शासन निर्यायान्वये ९३२ गट व ३५० गटांसाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, सदर योजनेकरिता आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्र.८ वरील शासन निर्णयान्वये निधी वितरीत करण्यास मान्यता प्राप्त झालेली आहे.

सन २०२१-२२ करिता मंजूर अर्थसंकल्पिय तरतूद आणि संदर्भ क्र. ७ वरील शासन निर्णया नुसार राज्य शासनाकडून यापूर्वी अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता वितरीत केलेल्या निधीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रु. लाख)

| तपशिल | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|
| मंजूर अर्थसंकल्पिय तरतूद | १९०.०० | १२७.०० | ३१७.०० |
| राज्य शासनाकडून यापूर्वीचा वितरीत निधी | ११.५७८७७ | ७.७१९३९ | १९.२९८१६ |

केद्र हिश्श्याच्या शिल्लक निधीच्या अनुषंगाने कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र. ०२ वरील पत्रान्वये निधी वितरणाबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०२१-२२ मध्ये अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता राबविण्यासाठी ९३२ गट व ३५० गटांसाठी मिळून केंद्र हिस्सा रु. २२.०४ लाख व राज्य हिस्सा रु. १५.०२ लाख निधी असा एकूण रु. ३७.०६ लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०२१-२२ मध्ये अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता राबविण्यासाठी ९३२ गट व ३५० गटांसाठी मिळून केंद्र हिस्सा रु. २२.०४ लाख व राज्य हिस्सा रु. १५.०२ लाख निधी असा एकूण रु. ३७.०६ लाख निधी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र हिस्सा लेखाशिर्ष | राज्य हिस्सा लेखाशिर्ष |
|---|---|
| <u>मागणी क्रमांक -टी-५</u><br>२४०१ पीक संवर्धन,<br>७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१ जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना<br>(०१)(३०)कृषि उन्नती योजना - परंपरागत कृषि विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना),<br>**केंद्र हिस्सा- ६०%,**<br>**२४०१ ए ७६२** कार्यक्रम, ३३ अर्थसहाय्य. | <u>मागणी क्रमांक -टी -५</u><br>२४०१ पीक संवर्धन,<br>७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१ जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना<br>(०१) (३१) कृषि उन्नती योजना - परंपरागत कृषि विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना),<br>**राज्य हिस्सा -४० %,**<br>**२४०१ ए ७७१** कार्यक्रम, ३३ अर्थसहाय्य. |

३. **राष्ट्रीय शाश्वत शेती अभियांनांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना राबविताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.**

१. सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार आणि प्रशासकीय मान्यतेनुसार राबविण्यात यावी.

२. खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

३. योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

४. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. ज्या संवर्गाकरिता निधी वितरीत करण्यात आलेला आहे त्याच संवर्गाकरिता निधी खर्च केला जाईल याची दक्षता घ्यावी.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक /तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांना या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस (PFMS) प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/ अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१ व शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणुन व सहायक संचालक लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ०६.०४.२०२१ व दिनांक २४.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये आदिवासी विकास विभाग तसेच कृषि व पदुम विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४८/व्यय-१४ दिनांक ०७.०३.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२२०३२९१५४७४७५१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mukund Vishnu Pagare

Digitally signed by Mukund Vishnu Pagare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Dairy Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=48f4766646938403cf715cfcacc4e9cf8390a87aaf449c1ed88cb826148e009b, serialNumber=44517d7206ff54aa54ec24c9bae87c2bb2f5169cabd10d03102ec48df58c2d09, cn=Mukund Vishnu Pagare
Date: 2022.03.29 15:49:34 +05'30'

**( मु. वि. पगारे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. विभागीय कृषि सहसंचालक, नाशिक/लातूर/अमरावती/नागपूर
१०.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.